अस्थायी पदे दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग
शासन निर्णय क्र.आस्था-२०२४/प्र.क्र.६२/ आस्थापना.
नवीन प्रशासकीय भवन, १८ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०४ मार्च, २०२४

वाचा-

१) पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.आस्था-२००६/प्र.क्र.९०/का.३, दि.२१.६.२००६.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.११.२.२०१६.
३) पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.आस्था-२०१५/प्र.क्र.२५७/आस्थापना, दि.८.६.२०१६.
४) पर्या. व वा. ब. वि., शासन निर्णय क्र.आस्था-२०१५/प्र.क्र.२२५/आस्थापना, दि.६.४.२०२३.
५) पर्या. व वा. ब. वि., शासन निर्णय क्र.आस्था-२०१५/प्र.क्र.२२५/आस्थापना, दि.१७.५.२०२३.
६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१/०२/२०२४.

**प्रस्तावना-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.६ येथील दि.२१/०२/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि. ३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयानुसार पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाच्या आस्थापनेवरील ११ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पर्यावरण विभागातील ४८ (४३ नियमित मंजूर + ५ अधिसंख्य पदे) पदांना अ.क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात आली आहे. विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयानुसार सदर ४८ पदांपैकी ८०% पदे (३७ पदे) स्थायी करण्यात आली आहेत.

२. पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाच्या आस्थापनेवरील सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामधील ११ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत पुढे सुरू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च २२५१-सचिवालय सामाजिक सेवा ०९०-सचिवालय (००) (०१) पर्यावरण विभाग (२२५१ ०२६७) ०१-वेतन व भत्ते या अर्थसंकल्पीय लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दि.२१/०२/२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०४१५५०४३४९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHAHEEN SHOUKAT JAMADAR

Digitally signed by SHAHEEN SHOUKAT JAMADAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=9511e997a3875edbd0967fa4ceec8ac31b688631de1c7a35e19dc30961f0438d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=856C57BEF6C4D3EF93F04760CAD099503CA65FCA1896CF77AC80CEFD468D30EA, cn=SHAHEEN SHOUKAT JAMADAR
Date: 2024.03.04 15:59:57 +05'30'

**( शाहीन शौ. जमादार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) प्रधान सचिव (पर्या व वा ब वि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा, मुंबई.
५) वित्त विभाग (अर्थ-७/व्यय १६), मंत्रालय, मुंबई.
६) कक्ष अधिकारी, रोखशाखा
७) निवडनस्ती.

## विवरणपत्र

पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, शासन निर्णय क्र. आस्था-२०२४/प्र.क्र.६२ /आस्थापना,
दि. ०४ मार्च, २०२४ सोबतचे विवरणपत्र

पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग (खुद्द) आस्थापनेवरील अस्थायी पदे

| अ.क्र | अस्थायी पदाचे नाव | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | शास्त्रज्ञ श्रेणी-२ | ३ |
| २ | कक्ष अधिकारी | ३ |
| ३ | वाहन चालक | १ |
| ४ | शिपाई | ४ |
| **एकूण** | | **११** |